**यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे सहायक अनुदान २०२३-२०२४ (अनिवार्य)**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : यशदा-२०२३/प्र.क्र.३०/२३/(१२-अ) प्रशि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ६ मार्च, २०२४

**वाचा :-** (१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र., अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थसंकल्प-३, दि. १२.०४.२०२३.
(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र., अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थसंकल्प-३, दि. ०५.०२.२०२४.
(३) शासन निर्णय क्रमांक : यशदा-२०२३/प्र.क्र.३०/२३/१२-अ, दिनांक : ०७.०६.२०२३.
(४) शासन निर्णय क्रमांक : यशदा-२०२३/प्र.क्र.३०/२३/१२-अ, दिनांक : ०१.१२.२०२३
(५) यशदा/सन २०२३-२४ चे सुधारित अंदाजपत्रक/न.क्र.१४२/२०२४, दिनांक ०६.०२.२०२४.

**प्रस्तावना :-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेस सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र : ए-४, प्रधान लेखाशीर्ष २०७०, सहायक अनुदान (अनिवार्य) (२०७० ०५३२) याखाली ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता रु. ३९२.०४ लाख (रुपये तीन कोटी ब्याण्णव लाख चार हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी संदर्भाधीन क्रमांक (१) व (२) येथील शासन परिपत्रकान्वये वित्त विभागाकडून ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता ७०% च्या प्रमाणात रु. २७४.४२८ लाख इतका निधी (बीम्स) प्रणालीवर प्रत्यक्ष उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीपैकी संदर्भाधीन क्रमांक (३) व (४) येथील शासन निर्णयान्वये "यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे" या संस्थेस ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता रु. ७८.४० लाख एवढा निधी आतापर्यंत वितरीत करण्यात आला आहे.

आता शिल्लक निधीतून संदर्भाधीन क्रमांक (५) येथील पत्रान्वये संस्थेने उर्वरीत निधी वितरीत करण्याची मागणी केली आहे. त्यानुसार ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) यावरील खर्च भागविण्यासाठी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला उर्वरीत निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेस सन २०२३-२४ या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र : ए-४, प्रधान लेखाशीर्ष २०७०, सहायक अनुदाने (अनिवार्य) (२०७० ०५३२) याखाली ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता रु. ३९२.०४ लाख (रुपये तीन कोटी ब्याण्णव लाख चार हजार फक्त) इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर करण्यात आली आहे. सदर मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीपैकी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (बीम्स) उपलब्ध असलेल्या निधीतून संस्थेस ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) करिता रु. १,९६,०२,८००/- (रुपये एक कोटी शहाण्णव लाख दोन हजार आठशे फक्त) इतका निधी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर खर्च मागणी क्रमांक : ए-४ मुख्य लेखाशीर्ष " २०७०-इतर प्रशासनिक सेवा-००३ प्रशिक्षण (००)(०६) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेस सहायक अनुदाने (अनिवार्य) (२०७० ०५३२) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून खर्च टाकण्यात यावा.

**३.** सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी तसेच सहायक अनुदाने (वेतनेतर) यावरील झालेल्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे, आणि संस्थेने आर्थिक वर्ष २०२३-२४ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सीमित ठेवावा.

**४.** यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-१, यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

**५.** संस्थेने वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकातील परिच्छेद क्र. ७ मध्ये नमूद केल्यानूसार देयक कोषागार अधिकारी यांना सादर करताना संस्थेचे मागील महिन्यातील बँक अकाउंट स्टेटमेंट (Bank Account statement) देयकासोबत जोडण्यात यावे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार मुद्दा क्र. ७ व ९ मधील अटी तसेच परिशिष्ट ९ मधील तपासणी सुचीमधील अटींची पूर्तता होत आहे. व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १२९/व्यय-४, दिनांक २३.०२.२०२४ अन्वये, निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१११७३९२९४२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SMITA PRASAD JOSHI

Digitally signed by SMITA PRASAD JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISRTATION DEPARTMENT, 2.5.4.20=d759e39e5163375d3782e5f6bef7edf6a25c72797123cdaa86acd09edf52baf1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=28AA5752FA66D3A7FDEAFB1F4AB24CD90FD9D667A6880CB8CCECA18276150ACA, cn=SMITA PRASAD JOSHI
Date: 2024.03.11 17:48:38 +05'30'

**( स्मिता जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

(१) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
(२) उपमहासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
(३) विभागीय आयुक्त, पुणे
(४) उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे
(५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
(६) उप कोषागार कार्यालय, पुणे
(७) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई
(८) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर
(९) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई
(१०)अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
(११) निवड नस्ती (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन-(१२अ) प्रशि-४